विभाग प्रमुख, शासकीय तंत्रनिकेतने व तत्सम संस्था, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ यांच्या सर्वसाधारण बदल्या- २०१८.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : बदली-४३१८/प्र.क्र. ८८/१८/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ जून, २०१८

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मंजूरीने तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या सेवेतील विभाग प्रमुख, शासकीय तंत्रनिकेतने व तत्सम संस्था या संवर्गातील नियम ४(५) नुसार केलेल्या बदल्या खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | शासकीय अधिका-याचे नाव | कार्यरत संस्था | बदलीनंतरची पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **विभाग प्रमुख, स्थापत्य अभियांत्रिकी** | | | | |
| १ | श्री.अनिल वासुदेवराव पावडे | शा.तं.नि. नांदेड | शा.तं.नि. ब्रम्हपुरी | विनंती बदली |
| **विभाग प्रमुख, विद्युत अभियांत्रिकी** | | | | |
| २ | श्री.सुरेंद्र भाऊराव शिरभाते | तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई | शा.तं.नि. मुर्तिजापूर | विनंती बदली |
| **विभाग प्रमुख, अणुविद्युत अभियांत्रिकी** | | | | |
| ३ | श्री.अनिल शामराव लातूरकर | शा.तं.नि. नाशिक | शा.नि.म.तं. नि. लातूर | विनंती बदली |
| ४ | श्रीमती प्रेरणा विजय राठोड | शा.नि.म.तं. नि. लातूर | शा.तं.नि. नाशिक | विनंती बदली |
| ५ | श्रीमती वैशाली प्रल्हाद यावलकर | शा.नि.म.तं. नि. यवतमाळ | शा.तं.नि. मुंबई | विनंती बदली |
| **विभाग प्रमुख, उपकरणीकरण** | | | | |
| ६ | श्री. बाळासाहेब कर्डिले | म.रा.तं.शि. मं. मुंबई | शा.तं.नि. अहमदनगर | विनंती बदली |

०२. उपरोक्त विभाग प्रमुखांची बदली त्यांची विनंतीनुसार असल्याने त्यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

०३. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतुदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मंजूरीने सदर बदल्या करण्यात येत आहेत.

०४. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरीता खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१) आदेश तात्काळ अंमलात येतील.

२) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर संबंधित विभाग प्रमुखांनी सध्या कार्यरत असलेल्या संस्थेतून तात्काळ त्यांची बदली नंतरची पदस्थापना केलेल्या संस्थेत रुजु व्हावे. तसेच सर्व संस्थाप्रमुखांनी पर्यायी विभाग प्रमुख हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या विभागप्रमुखांना तात्काळ कार्यमुक्त करावे.

३) बदली झालेले विभाग प्रमुख त्यांच्या संबंधित संस्थेकडून कार्यमुक्त होऊन रुजु होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजु करुन घ्यावे. एखाद्या विभागप्रमुखास रुजु करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षा काळ ठरुन काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित संस्थेचे प्राचार्य यांना जबाबदार धरण्यात येईल.

४) पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

५) बदली झालेल्या विभाग प्रमुखांची कोणतीही रजा प्रशासकीय विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येऊ नये.

६) सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व विभाग प्रमुखांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे अथवा जास्तीत जास्त **दि. ३० जून, २०१८** पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या संस्थेने / आस्थापनेवर काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या संस्थेकडून/ आस्थापनेकडून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या संस्थेत रुजु झाल्यानंतर बदलीनंतरच्या संस्थेने/ आस्थापनेने काढावे. **दि.०१ जुलै, २०१८** पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या संस्थेतील / आस्थापनेतील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

७) बदली झालेल्या विभाग प्रमुखांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची जबाबदारी वैयक्तीकरित्या संबंधित संस्था प्रमुखांची राहील. याबाबतचा पाठपुरावा संबंधित विभागीय सहसंचालकांनी करावा, तसेच याबाबत कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्यांत संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी न चुकता या विभागास कळवावा.

०५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१९१७४९४०१४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2018.06.19 17:50:09 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित विभाग प्रमुख, (प्राचार्य यांचेमार्फत )

**प्रत :**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
५) उप सचिव (तंशि) उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
६) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
८) सर्व उपसचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ विभागीय कार्यालये (तंत्रशिक्षण संचालनालय यांचेमार्फत),
९) सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये (तंत्रशिक्षण संचालनालय यांचेमार्फत),
१०) सर्व प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतने व तत्सम संस्था (तंत्रशिक्षण संचालनालय यांचेमार्फत),
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर,
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /बांद्रा,
१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई / बांद्रा,
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व संबंधित जिल्हे) (तंत्रशिक्षण संचालनालय यांचेमार्फत),
(वरील अ.क्र. १०,११, १२, १३ व १४ यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या सर्व अधिकाऱ्यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे अथवा जास्तीत जास्त दि. ३० जून, २०१८ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या संस्थेमार्फत अदा करावयाचे आहे. सदर सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.)
१५) निवड नस्ती (तांशि-७).